कोतवालांच्या मानधनात वाढ करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२२/प्र.क्र.१९१/ई-१०**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ०६ एप्रिल, २०२३

**वाचा :**
(१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.बैठक-२०१६/प्र.क्र.५८१/ई-१०, दि.१८/०३/२०१७
(२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.बैठक-२०१६/प्र.क्र.५८१/ई-१०, दि.०६/०२/२०१९ व दि.०१/०३/२०१९
(३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.संकीर्ण-२०१३/प्र.क्र.१२५/ई-१०, दि.१३/०१/२०१४

**प्रस्तावना :-**

राज्यातील कोतवालांनी विविध निवेदनाव्दारे, कोतवाल हे शासकीय कर्मचाऱ्यांप्रमाणेच २४ तास शासकीय कामास बांधिल असून कोतवालांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या निश्चित करण्यात आलेल्या आहेत. कोतवालांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या तसेच कामाच्या स्वरुपाचा विचार करता, राज्यातील कोतवालांना मिळणारे मानधन हे तुटपंजे स्वरुपाचे असल्याने त्याचप्रमाणे महसूल व वन विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक (२) येथील शासन निर्णयान्वये कोतवालांना लागू करण्यात आलेल्या मानधनवाढीत वय वर्षे ५० वर्षावरील आणि वय वर्ष-५० च्या आतील कार्यरत कोतवालांच्या सेवाकालावधीनुसार देण्यात येणाऱ्या मानधनात तफावत असल्याने सदरची तफावत दूर करण्याबाबत राज्यातील कोतवालांनी मा. मुख्यमंत्री, मा.उपमुख्यमंत्री, मा.मंत्री महोदय व मा.लोकप्रतिनिधींना वारंवार भेटून कोतवालांना सरसकट एक समान पंधरा हजार रुपये इतके मानधन देण्याची मागणी करीत असतात. त्यानुषंगाने मा.उपमुख्यमंत्री तथा वित्त मंत्री महोदय यांनी दि.०९/०३/२०२३ रोजी राज्याचा सन २०२३-२४ करीताचा अर्थसंकल्प सादर करतांना अर्थसंकल्पीय भाषणात केलेल्या घोषणेप्रमाणे राज्यातील कोतवालांना मानधनवाढीचा प्रस्ताव गुरुवार, दि.१७/०३/२०२३ रोजीच्या मा. मंत्रिमंडळाच्या बैठकीमध्ये सादर करण्यात आला असता, मा. मंत्रिमंडळाने यासंदर्भात घेतलेल्या निर्णयानुसार राज्यातील कोतवालांच्या मानधनात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कोतवाल संवर्गाच्या बाबतीत "एका साझास एक कोतवाल" असे धोरण निश्चित करण्यात आले आहे. त्याप्रमाणे राज्यातील कोतवालांची संख्या-१२,३२७ व संदर्भीय क्रमांक (३) येथील दिनांक १३/०१/२०१४ च्या शासन निर्णयान्वये, गडचिरोली जिल्ह्यातील संवेदनशिल गावांकरीता कोतवाल संवर्गाच्या ४६६ अतिरिक्त पदांना मंजूरी देण्यात आलेली आहे. महसूल व वन विभागाच्या संदर्भीय क्रमांक (२) येथील दि.०६/०२/२०१९ व दि.०१/०३/२०१९ च्या शासन निर्णयातील परिच्छेद-१ मधील नमूद मानधनाऐवजी आता वर नमूद केल्याप्रमाणे राज्यातील एकूण १२,७९३ कोतवालांना यापुढे दरमहा रु.१५,०००/- (रुपये पंधरा हजार फक्त) इतके मानधन दि.०१/०४/२०२३ पासून लागू करण्यात येत आहे.

**२.** महसूल व वन विभागाच्या संदर्भीय क्रमांक (२) येथील दि.०६/०२/२०१९ व दि.०१/०३/२०१९ च्या शासन निर्णयातील परिच्छेद-२ मधील "जे कोतवाल वरीलप्रमाणे वर्ग-ड च्या सदर कोट्यातील पदांवर पदोन्नतीस पात्र ठरतील त्यांना सदर पदावर नियुक्ती होईपर्यंत दरमहा रु.१५,०००/- इतके मानधन देण्यात यावे" ही तरतूद वगळण्यात येत आहे. तसेच उक्त शासन निर्णयांतील उर्वरित तरतूदींमध्ये कोणताही फेरबदल केला नसून सदरच्या तरतूदी जशाच्या तशाच लागू राहतील.

**३.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१७४५२, दि.०९/११/२०२२ व अनौ.संदर्भ क्र.१२३, दि.०९/१२/२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२३०४०६१९१२१३९७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY BANKAR

Digitally signed by SANJAY BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, pseudonym=B37546F6A6BD466ED45270ED708F924F51A07EA8, serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY BANKAR
Date: 2023.04.06 19:17:39 +05'30'

**(संजय बनकर)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सर्व विभागीय आयुक्त,
२. सर्व जिल्हाधिकारी,
३. महालेखापाल, १/२ (लेखापरिक्षक) मुंबई / नागपूर
४. महालेखापल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर
५. अवर सचिव (कार्यासन व्यय-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. कार्यासन अधिकारी (कार्यासन ई-७), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. निवडनस्ती (कार्यासन- ई-१०)